सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला या विद्यापीठास ३५,भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान वितरीत करण्याबाबत.... (कार्यक्रम)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.: पंदेवि-१३२३/प्र.क्र.१४५/७-अे,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३०/०३/२०२४

**वाचा :-** १)वित्त विभागाचे,परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय,क्र.पंदेवि-१३२२/प्र.क्र.९५/७-अे, दि.०४.०३.२०२४.
३)नियंत्रक,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला यांचे पत्र क्र.अप्रवि/ अंदाज/कार्यक्रम/३५/२३६४/२०२४, दि.०६.०३.२०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला या कृषि विद्यापीठास मागणी क्र.डी-३, ०१ पीकसंवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(०८) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ००९९) या लेखाशीर्षांतर्गत ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या बाबीकरीता एकूण रु.३०००.०० लाख इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली होती. सदर लेखाशिर्षांतर्गत चालू आर्थिक वर्षात वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील परिपत्रकानुसार उपलब्ध झालेल्या निधीमधून एकूण रु.४८०.०० लाख निधी संदर्भ क्र.२ येथील दि.०४.०३.२०२४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला विद्यापीठांतर्गत चालू असलेल्या विविध महाविद्यालयांच्या इमारत बांधकामांकरीता लेखाशिर्ष (२४१५ ००९९) अंतर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान या उद्दीष्टाखाली मंजूर तरतूदीमधून निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती नियंत्रक,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये केली आहे. त्यानुषंगाने डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला विद्यापीठास लेखाशिर्ष (२४१५ ००९९) अंतर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान या बाबीकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता,मागणी क्र.डी-३,०१,पीकसंवर्धन,१२०,इतर संस्थांना सहाय्य, (००)(०८) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठास सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००९९,

या लेखाशीर्षांतर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या बाबीकरीता एकूण रु.१२००.०० लाख (अक्षरी रुपये बारा कोटी फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचा सविस्तर तपशिल पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ क्र | लेखाशिर्ष/ उपशिर्ष | सुधारित अंदाज (२०२३-२४) | वितरीत निधी | योजनेंतर्गत येणारे महाविद्यालय/ बांधकामाचे नाव | प्रशासकीय मान्यता आदेश | प्रशासकीय मान्यता किंमत | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | (००) (०८) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठास सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००९९, ३५,भांडवली मत्तेच्या निर्मिती-करीता अनुदान | १७८०.०० | ४८०.०० | कृषि संशोधन केंद्र, सिंदेवाही जि.चंद्रपूर केंद्राचे बळकटीकरण | शा.नि.क्र.पंदेवि-१३१६ /प्र.क्र.१०१/(८अे)/७ अे दि.१६.०७.२०१८ | ११५०.८० | १५०.०० |
| २ | | | | कृषि महाविद्यालय, नागपूर महाराज बाग, सर्व्हे क्र.३११ मौजा लेंड्रा व अंबाझरी येथे वनस्पती संशोधन क्षेत्रिय कार्यालय आणि सायंटिस्ट होमचे बांधकाम करणे. | शा.नि.क्र.पंदेवि-१३१८/ प्र.क्र.२०/७अे दि.१७.०७.२०१८ | ३२७.७० | ६०.०० |
| ३ | | | | डॉ.पं.दे. कृ.वि. अकोला येथे मुलींचे वसतीगृह बांधकाम करणे. | | ४८९.७३ | ९२.५० |
| ४ | | | | डॉ.पं. दे. कृ.वि. अकोला येथे मुलांचे वसतीगृह बांधकाम करणे. | | ४८९.७३ | ९३.५० |
| ५ | | | | नागपूर येथील कृषि महाविद्यालयाचे पदव्युत्तर मुलींचे वसतीगृह इमारत बांधकाम करणे. | | ४९१.५६ | १००.०० |
| ६ | | | | डॉ.पं. दे. कृ.वि. अकोला अंतर्गत नागपूर येथील अस्तित्वातील मुलींचे वसतीगृहाचे दुस-या माळयावरील भोजन कक्ष व मनोरंजन कक्षाचे बांधकाम करणे. | | ४५१.२४ | १००.०० |
| ७ | | | | डॉ.पं.दे.कृ.वि.अकोला अंतर्गत कृषि महाविद्यालय, नागपूरचे महाराज बाग सर्व्हे क्र.८३/४ मौजा लेंड्रा येथे माळी ट्रेनिंग सेंटरचे बांधकाम करणे. | शा.नि.क्र.पंदेवि-१३१८/ प्र.क्र.२०/७अे दि.२७.०८.२०१८ | ५४४.५६ | १०४.०० |
| ९ | | | | अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय, यवतमाळ. | शा.नि.क्र.पंदेवि-१३१९/ प्र.क्र.१२३/७अे दि.३०.०६.२०२३ | ११७७४.०५ | २००.०० |
| | | | | भाऊसाहेब फुंडकर शासकीय कृषि महाविद्यालय,बुलढाणा. | शा.नि.क्र.पंदेवि-१३२३/ प्र.क्र.२५२/७अे दि.१५.०१.२०२४ | ९६०१.४२ | ३००.०० |
| | **एकूण** | **१७८०.००** | **४८०.००** | - | - | **२५३२०.७९** | **१२००.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) ज्या योजनांतर्गत योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सहायक लेखाधिकारी,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान विद्यापीठाचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१),१९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच, नियोजन व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारीक

संदर्भ क्रमांक १८७/का.१४३१,दि.१४.०३.२०२४ व क्रमांक १३२/२०२४/व्यय-१,दि.२०.०३.२०२४ च्या अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३३०१७२६१८११०१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2024.03.30 17:35:53 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग यांचे स्वीय सहायक मंत्रालय मुंबई.
३. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद पुणे.
४. कुलगुरु/कुलसचिव,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला.
५. वित्तीय सल्लागार,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
६. नियंत्रक,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला.
७. सहायक लेखाधिकारी,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला.
८. महालेखापाल,महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला / उपकोषागार अधिकारी, अकोला.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई /निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
११.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१२.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१४.कक्ष अधिकारी, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.